**चंद्रपूर येथे सैनिकी शाळेचे बांधकाम करण्यासाठी निधी वितरणास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रिडा विभाग**
**शासन निर्णय क्र. चंसैशा-२०१८/प्र.क्र.११४/एसएम-६**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २१ ऑक्टोबर, २०२०

वाचा :

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. इसैशा-२०१६/ प्र.क्र.९६/ एसएम-६ दिनांक १३.०४.२०१७

२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. चंसैशा-२०१७/ प्र.क्र.५५/ एसएम-६ दिनांक २२.०८.२०१७

३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. चंसैशा २०१८/ प्र.क्र. ३३/ एसएम-६ दिनांक १२.०९.२०१८

४) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. चंसैशा २०१९/ प्र.क्र. ७५/ एसएम-६ दिनांक २९.०६.२०१९

५) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. चंसैशा २०१९/ प्र.क्र. ७५/भाग-१/ एसएम-६, दिनांक २९.०६.२०१९

६) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८.०७.२०१९

७) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. चंसैशा २०१८/ प्र.क्र. ११४/ एसएम-६ दिनांक ०५.०८.२०१९

८) मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,चंद्रपूर यांचे क्र.जिपचं/शि(मा)/सैशा/ /२०२०, दिनांक ०५.१०.२०२०

९) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. पूरक-२०२०/प्र.क्र.१०५/अर्थ-३, दिनांक १८.०९.२०२०

**प्रस्तावना :**

भिवकुंड, जि. चंद्रपूर येथील सैनिकी शाळेच्या प्रवेशद्वारासह संरक्षण भिंत, सिमेंट काँक्रीट नालीसह पोचमार्गाचे बांधकाम करण्याबाबतच्या रु. १२३६.७७ लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभाग तसेच वित्त विभाग व सचिव समितीच्या मान्यतेने संदर्भाधीन क्र. (१) येथील दिनांक १३.४.२०१७ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिली आहे. तसेच चंद्रपूर सैनिकी शाळेच्या इमारती व पायाभूत सुविधांचे बांधकामासाठी रु. २९६.८५ कोटी रकमेच्या अंदाजपत्रकास संदर्भाधीन क्र. (२) येथील दिनांक २२.८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिली आहे. चंद्रपूर सैनिकी शाळेच्या अतिरिक्त (भाग-२) बांधकामासाठी रु.१९२.०० कोटी रकमेच्या अंदाजपत्रकास संदर्भाधीन क्र. (३) येथील दिनांक १२.९.२०१८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिली आहे. वस्तु व सेवाकरामुळे वाढ व सविस्तर अंदजपत्रकांच्या आधारे कार्यान्वीत करण्यात आलेले कंत्राट, यामुळे सदर कामाच्या अनुक्रमे रु. ३५७.२० कोटी व रु. २०४.०७ कोटी च्या सुधारीत अंदाजपत्रकांस संदर्भाधीन क्र. (४) व (५) येथील दिनांक २९.०६.२०१९ च्या शासन निर्णयान्वये सुधारित प्रशासकीय मान्यता दिली आहे. सदर बांधकामासाठी अद्यापपर्यंत रु. ४९७ कोटी इतका निधी उपलब्ध करुन दिला आहे.

२. भिवकुंड, जिल्हा चंद्रपूर येथील नवीन सैनिकी शाळेच्या इमारतीचे व पायाभूत सुविधांचे बांधकाम विहित कालावधीत पूर्ण करण्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर यांनी रु. ७६६३.७७ लक्ष इतका निधी वितरीत करण्याची मागणी संदर्भाधीन क्र. ( ८ ) अन्वये केली आहे. प्रस्तुत बांधकामासाठी सन २०२०-२१ या वित्तीय वर्षात सप्टेंबर,२०२० च्या पावसाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे रु. ७६६३.७७ लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. वित्त विभागाने पूरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित केलेल्या निधीच्या ५०% निधी वितरीत करण्यास मान्यता दिली आहे. त्यानुसार रु.३८,३१,८८,५००/- इतका निधी चंद्रपूर सैनिक शाळेच्या बांधकामासाठी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**

चंद्रपूर सैनिक शाळेच्या बांधकामासाठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात, वितरीत निधी विहित पध्दतीने खर्च केला जाईल व वितरीत निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करण्याच्या अटीच्या अधीन राहून रु.३८,३१,८८,५००/-(रुपये अडतीस कोटी एकतीस लाख अठ्ठ्याऐंशी हजार पाचशे) इतका निधी वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात "मागणी क्र. ई-४, ४२०२- शिक्षण, क्रीडा, कला,व संस्कृती यावरील भांडवली खर्च, ०१ सर्वसाधारण शिक्षण, २०२ माध्यमिक शिक्षण, (०१)- सैनिकी शाळेचे बांधकाम, (००) (०५) चंद्रपूर येथे सैनिकी शाळेचे बांधकाम करणे (कार्यक्रम), (४२०२ ६४३३), ५३ मोठी बांधकामे" या लेखाशिर्षातून खर्ची टाकण्यात येईल. सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "नियंत्रक अधिकारी" तसेच शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, चंद्रपूर यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. नियंत्रक अधिकारी यांनी कामाबाबतचा अहवाल वेळोवेळी शासनास सादर करावा व याबाबत महालेखापाल कार्यालयाशी ताळमेळ करुन त्याबाबतचा अहवाल सादर करावा.

३. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शक सूचनांचे, तसेच वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३,दिनांक ०२.०४.२०१८ व क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र.९४/अर्थ-३, दिनांक ३०.६.२०१७ च्या परिपत्रकातील आदेशांचे काटेकोर पालन करणे आवश्यक राहील.

४. सदर आदेश वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.४५०/२०२०/व्यय-५, दिनांक ०९.१०.२०२० अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१०२११७५५०४९५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Imtiyaz Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, serialNumber=77a529748c5e7c1ba7a66e81c654ba3c492fda5b29e076241db1ba213ddedf4e, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2020.10.21 17:56:41 +05'30'

**( इ. मु. काझी )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई ३२

२. सर्व विधान सभा /विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र राज्य, मुंबई

३. मुख्य सचिव यांचे उप सचिव
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त ( शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
८. जिल्हाधिकारी, चंद्रपूर
९. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर,
१०. शिक्षण संचालक ( माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
११. शिक्षण संचालक ( प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१२. विभागीय शिक्षण उप संचालक,नागपूर विभाग, नागपूर
१३. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर
१४. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. २, चंद्रपूर,
१५. शिक्षणाधिकारी ( माध्यमिक ) जिल्हा परिषद चंद्रपूर
१६. शिक्षणाधिकारी ( प्राथमिक ) जिल्हा परिषद चंद्रपूर
१७. प्राचार्य, सैनिकी स्कूल, चंद्रपूर
१८.कक्ष अधिकारी , (व्यय ५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१९.कक्ष अधिकारी( अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
२०. निवडनस्ती.

**प्रत माहितीसाठी-**

१. मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई ३२
२. मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई ३२
३. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ३२.